घरांतील वास्तुदोष, कालसर्प दोष, बाधा, आजार पीडा नाहीशी होण्यासाठी वर्षातून एकदां तरी उदक शांति विधी करून अनुभव घ्या!

# पुराणोक्त उदक शांति विधी

(अपामार्जन विधीची मराठी पोथी)

अनुवादक :- डॉ. सीताराम गणेश देसाई



● बी. जी. पाठक आणि कंपनी ●

**चित्रकार**

श्री. जयवंत ठाकुर

**फोटो टाईप सेटींग**

श्री. गं. आ. नारकर
मानकरी मुद्रणालय
ए, विमल उद्योग भुवन,
टायकलवाडी, माहीम,
मुंबई - ४०० ०१६.
दूरध्वनी : ४३० ३५११

**मुद्रक**

श्री. रविंद्र प्रभु
बिंदु आर्टस
३१४, प्रगति इंड. इस्टेट,
ना. म. जोशी मार्ग,
मुंबई - ४०० ०११.

**प्रकाशक**

श्री. बी. जी. पाठक
९५ मिर्झा स्ट्रीट,
झवेरी बाजार,
मुंबई - ४०० ००३.
✆ : ३४१ ४०२५

आवृत्ती १ ली
**श्री हनुमान जयंती**
३१-३-१९९९
**किंमत २५ रुपये**

॥ श्री ॥

प्रिय उपासकांनो !

गेले अनेक दिवस आपण ज्या **पुराणोक्त उदक शांती विधी** या पुस्तकाची वाट पहात होतात. ते पुस्तक अनेक अडचणींना, अडथळयांना तोंड देऊन, त्या सर्वांवर मात करून प्रकाशित करीत आहे.

ज्या घरांमध्ये नेहमी घाण, केरकचरा असतो किंवा घरांत कोणी बाळंतीण गेलेली असते, आत्महत्या वा मृत्यू अपमृत्यू झालेला असतो किंवा मृतात्म्यांचे श्राद्ध कर्म नीट केले जात नाही, कोणाचे हक्काचे फसवून घेतलेले घर वा इस्टेट असेल तर त्या व्यक्तीचे तळतळाट, आपल्याला अदृश्य रुपाने नेहमी त्रास देत राहतात. घरांत शांतता रहात नाही नेहमी असमाधान, भांडणे, कटकटी होत राहतात. थोडक्यात आपले घर बाधीत वास्तु ठरते. त्याकरीतां आपण तीन वर्षांनी एकदा तरी आपल्या घरांत **पुराणोक्त उदक शांति विधीपूर्वक** जाणकाराकडून करून घ्यावी. त्यावेळी **होम हवन** अवश्य करून घ्यावे. या सर्वांची माहिती, मार्गदर्शन या पुस्तकात विस्तृतपणे दिलेले आहे ते आपल्याला उपयोगी पडेल. आपल्या घराच्या दरवाज्यावर **गदाधारी श्री हनुमानाचे** चित्र लावा तसेच आपले घर शुद्ध, स्वच्छ व पवित्र राहण्यासाठी घरांत रोज देवपूजा करणे आवश्यक आहे, घरांत रोज **श्री शिवलीलांममृत ६वा अध्याय, श्री शिवकवच, श्री नवनाथ ५वा अध्याय, श्री देवी कवच, श्री कुंजिका स्तोत्र, श्री विष्णु सहस्त्रनाम, श्री गजानन विजय ग्रंथाचे पारायण** किंवा किमान **श्री रामरक्षा स्तोत्र** तरी रोज संध्याकाळी तुपाचा दिवा, धुप, अगरबत्ती लावून म्हणणे आवश्यक आहे. घरांत रोज सडा समार्जन करून देवापुढे रांगोळी काढा. घाण, केरकचरा ठेवू नका. घरी आल्यावर हातपाय धूवावे. कोणाला स्मशानात पोचवून आल्यावर बाहेरच आंघोळ करून मगच घरी जावे. घरांत **श्री नवनाथाच्या** फोटोला फूल वाहून अगरबत्ती दाखवावी. घरांतील लाद्या, फरशा धुवून स्वच्छ ठेवाव्यांत, घरांत दर दोन चार दिवसांनी गोमुत्र वा पाण्यांत हिंग घालून घरांत शिंपडावे असे साधे सोपे उपाय मुद्दाम आहे ते करून बघा. नित्य उपासनेने आपले घर वास्तु दोष विरहित होईल. सुखसमाधान घरांत नांदेल आणि हे सर्व करणे तुम्हाला सहज शक्य आहे. मात्र त्यासाठी आपली मनापासून करण्याची इच्छा पाहिजे. आपण करून बघा, अनुभव घ्या ही नम्र विनंती.

आपला
**भालचंद्र गजानन पाठक**

॥ श्री हनुमते नमः ॥



## पूराणोक्त

# उदकशांती विधीची पोथी

## (अपामार्जन विधीची मराठी पोथी)

लेखक : डॉ. सीताराम गणेश देसाई

आपले घर (वास्तु) कालसर्प योगावर सोपे तोडगे व उपासनेसह प्रभावी मार्गदर्शन.



प्रकाशक: बी. जी. पाठक, ९५, मिर्झा स्ट्रीट, मुंबई ३. ✆ : ३४१४०२५ • किंमत २५ रुपये

---

**प्रमुख विक्रेते :**

तुकाराम बुक डेपो, जगदीश्वर बुक डेपो, गर्ग आणि कंपनी, सी. पी. टँक, मुंबई ४
प्रकाश मुसळे, मॅजेस्टीक बुक स्टॉल, अनमोल एजन्सी गिरगांव, मुंबई ४,
सेंट्रल एजन्सी, मुंबई ७ गुरुकृपा धार्मिक, लालबाग, आयडीअल बुक डेपो,
मॅजेस्टीक एजन्सी, श्री गजानन बुक डेपो, श्री सुदर्शन बुक डेपो, दादर
जवाहर बुक डेपो, पार्ले, गणपत भारमल, अंधेरी, गीता एजन्सी, मालाड,
विद्वांस ब्रदर्स, ब्राह्मण सभेसमोर, ठाणे (प.) किर्ती स्टोअर्स, ठाणे
गद्रे बंधु, डोंबिवली (पू.). वा.म. गोडबोले, पुणे, संदेश एजन्सी, रत्नागिरी,
कोरगांवकर बुक स्टॉल, सावंतवाडी

।। श्री ।।

प्रिय उपासकांनो !

आपण सर्वजण आतुरतेने ज्या पुस्तकाची वाट पहात होता तें **पुराणोक्त उदकशांति विधी (अपामार्जन विधी)** चे पुस्तक आज प्रकाशित करतांना मला कर्तव्य पूर्ण केल्याचे समाधान तर वाटत आहेच पण आज शाबासकीची पाठ थोपटणारे माझे परम व्यासंगी विद्वानलेखक कल्याणमित्र **रमेश भिकाजी तांबे** आज आपल्यात नाहीत याचे दुःख वाटत आहे. त्यांच्या स्मृति प्रित्यर्थ मी हे पुस्तक अनंत अडचणी व अडथळे येत असूनही आज प्रकाशित करत आहे. आपल्या घरांतील मृतात्म्यांना मुक्ति शांति सद्गति मिळावी म्हणून उदकशांति विधी घरी करणे आवश्यक आहे. त्याचीच माहिति येथे दिली आहे.

उदकशांति ही मूळ वेदोक्त आहे. सर्वसामान्य जनांसाठी **अपामार्जन विधी** उर्फ **पुराणोक्त उदकशांति विधी** सांगितला आहे. बऱ्याच जणांना हें माहीत नाही. मलाही **''अपामार्जन विधी''** स्वतंत्र पुस्तक पोथी रुपाने मिळत नव्हती म्हणून मी **''कृत्यदिवाकर''** या पोथीतून ह्या अपामार्जन विधीची प्रत मिळविली. त्यासाठी ठाकुरद्वार येथील **भारत बुक डेपोचे श्री. शशीकांत आवटी** यांनी मला चांगले सहकार्य केले. नंतर मी ह्या संस्कृत पोथीचे मराठी भाषांतर प्रसिद्ध संस्कृत पंडित **डॉ. सीताराम गणेश देसाई** यांचे कडून करून घेतले व मूळ अपामार्जन विधी (संस्कृतमधला) व पुरोणोक्त उदकशांति विधींची पोथीही मराठीत व्यवस्थित सोप्या मराठी भाषेत छापली आहे. याच बरोबर **कालसर्प योगावर व बाधित वास्तु (घर) वर** कांही सोपे तोडगेही दिले आहेत. शहरी व खेड्यातील नवीन शिकाऊ पुरोहितांना, गरजूंना याचा चांगला उपयोग होईल असे वाटते.

या पोथीत **''हवन विधी''** सांगितला नाही. दिलेलाही नाही. तरीही माझे आग्रहाचे मत असे आहे कीं **हवनविधी** अवश्य करावा. यामुळे घरांतील वास्तूदोष नाहीसा होतो. दर ३ वर्षांनी एकदा तरी घरांत हा विधी करून अनुभव घेऊन पहा. आपली सर्व पीडा, त्रास, क्लेश नाहीसे होतील. हे पुस्तक छापतांना मला स्वतःलाही कांही विचित्र अनुभव येत गेले. घरांत सारखे कोणी ना कोणी आजारी पडणे, प्रकाशनांत बिनाकारण अडथळे येत गेले तरीही मनाचा हिय्या करून मी हे पुस्तक आज प्रकाशित करीत आहे. याकामी मानकरी प्रेसचे श्री. नारकर व त्यांचा स्टाफ, चित्रकार जयवंत ठाकूर, दादरचे ज्यो. बाळकृष्ण जोशी, गिरगांवचे राजेश पदे गुरुजी, अंधेरीचे जाणकार देवी उपासक श्री. उदास गुरुजी या सर्वांचे मोलाचे सहाय्य व मार्गदर्शन मिळाले. मी त्या सर्वांचा अतिशय आभारी आहे. आपल्या घरांतील सर्व वास्तुपीडा दोष, बाधा नाहीशा होऊन आपण सर्वांना सुखशांतीचे आयुष्य लाभो अशी प्रार्थना करतो. हा विधी केल्यावर आपला अनुभव मात्र अवश्य कळवा. ही नम्र विनंती. शुभं भवतु.

आपला, **बी. जी. पाठक**

।। श्रीः ।।

श्री विष्णुधर्मोत्तर पुराणातील दाल्भ्य आणि पुलस्त्य मुनींच्या संवादातील अपामार्जन स्तोत्राचा हा मराठी ओवीबद्ध अनुवाद. ह्या स्तोत्रालाच **पौराणिक उदकशान्ति** असे नाव काही विचारवंतांनी दिले आहे.

**।। श्रीगणेशाय नमः ।।**

**दाल्भ्य मुनी विनविती पुलस्त्यासी । भगवन्ता, दुष्ट ग्रह सर्वप्राणिमात्रांसी । दुष्ट ग्रह विष रोगादींच्या उपद्रवासी । भोगावे लागे सर्वकाळ ।।१।।**

**जारणमारणादी संकटांच्या प्रभावाने । भयंकर स्पर्शरोगांदींच्या मुळे । मुनिश्रेष्ठा, सर्वदा संत्रस्त पीडेने । होत असती सर्व प्राणी ।।२।।**

**कोणत्या कर्माच्या परिणामाने होत । दुष्टग्रह रोगादींनी मनुष्य पीडित । कोणत्या उपाये ते मुक्त होतात । ते संपूर्ण कृपया मज सांगावे ।।३।।**

**पुलस्त्य तयासी सांगती । जनार्दन जगद्गुरु जो भूपती । महामुने त्याचे सतत स्मरण करी जो चित्ती । तयासी लाभते शुभ सकलही ।।४।।**

**तया मानवाची जगती । दुष्ट दुरिते निःशेष जाती । अखिल कार्यांत यशप्राप्ती । मिळेल त्यासी निःसंशय ।।५।।**

जयांनी पूर्वजन्मात । व्रत उपवासादींनी विष्णुदेव न केला संतुष्ट । ते नर ग्रहरोगांदींनी पीडित । मुनिशार्दूला या जन्मीं होतात ।।६।।

जयांनी विष्णुप्रवण स्वचित्त । सदा सर्वकाळ केले नसत । विष, ग्रह, ज्वरादींनी युक्त । दाल्भ्या होतात ते नर ।।७।।

आरोग्य परम समृद्धी आदी इच्छित । मनाने जे जे प्राणिमात्र जगात । अच्युतदेवा तुष्ट करिता लाभत । ते ते सर्वही निःसंशय ।।८।।

मधुसूदनासी जेणे केले संतुष्ट । तयासी मानसिक अथवा शारिरिक कष्ट । आधि व्याधी विषग्रहबंधन भय नुरत । होते नष्ट जादूटोणा-देवतेची भीतीही ।।९।।

सर्व दुष्ट ग्रहरोगादींचे शमन होत । सकल ग्रहांची कृपादृष्टी लाभत । देवांसीही अजिंक्य तो नर होत । ज्यावरी प्रसन्न जनार्दन ।।१०।।

जो सर्व प्राणिमात्रास समान । जैसे स्वतःसी तैसेचि अन्यास एकमन । उपवासादी योगे मधुसूदन । तोषविला जयाने ।।११।।

ऐश्या परी मधुसूदन विष्णू प्रसन्न होत । तै मनुष्याचे मनोरथ पूर्ण होतात । हे मुनिश्रेष्ठा भोगभोक्ते सुखी जगात । सर्वदा होती रोगमुक्त ।।१२।।

त्यांना शत्रू न पीडिती । न तया स्पर्श-रोग चेटुकाची भीती । ग्रहरोगादिकही गतप्रभ होती । पापकृत्य काही उरत

नसे ।।१३।।

सुदर्शन चक्रादी आयुधे अखंडित । कृष्णाची जी प्रख्यात । सर्व आपत्तींतुनी तयासी रक्षित । जेणे विष्णू पूजिला ।।१४।।

दाल्भ्य तदनंतर विचारित । पुलस्त्या सांग मजप्रत । जे नर बिचारे दुःखी जगात । गोविन्द ज्यांनी न आराधिला ।।१५।।

तैश्या दुःख पीडितांनी काय करावे । दयावंता, ते निरूपावे । त्यांनी सर्वांभूती वासुदेवास पाहावे । समदृष्टी हृषीकेशासी ।।१६।।

पुलस्त्य म्हणती मुनिश्रेष्ठा तुजप्रती । सांगेन ते व्रत ऐक दृढमती । रोगदोष हारी जगती । महत्पातक नाशी मनुष्याचे ।।१७।।

सोन्याचा वा चांदीचा । तांब्याचा वा मातीचा । नवा डागरहित शुद्ध कलश साचा । तांदुळांवरी ठेवावा ।।१८।।

त्यात शुद्ध निर्मळ पाणी भरून । शंभर अग्रसहित दर्भ पावन । ठेवावे ते कलशावरी शुद्धमन । नंतर ऐसे प्रार्थावे ।।१९।।

ब्रह्मदेवासह उत्पन्न । परश्रेष्ठी निसर्गज महान । हे दर्भा सर्व पापे दूर करून । स्वस्ति कल्याणकारी तू हो ।।२०।।

कुश म्हणजे दर्भ ज्याच्या मुळात । ब्रह्मा असे निवसत । मध्यभागी जनार्दन राहत । कुशाग्री शंकर जाणावा ।।२१।।

तीनही देव दर्भांत स्थित । ते समूळ शुद्ध दर्भ घेऊन

करात । सर्वांगी स्पर्शून प्रोक्षण करिता होत । दाल्भ्या शांतिप्रद होती ।।२२।।

दर्भापासून जलबिंदू पडती । जयाच्या शरीरावरती । त्याची सर्व पापे नष्ट होताती । गरूडाकडून सर्प जैसा नष्ट होय ।।२३।।

विशेषे विष्णुभक्ताने । पवित्र राहून तद्‌गतमने । ही शान्ति करावी दर्भाने । रोग दुष्टग्रह विषपीडितांस्तव ।।२४।।

वराह नरसिंह वामनासी । वामना तैसेची विष्णूसी । आठवावे जागरूक होऊन मानसी । करावा न्यास विविध दिशांत ।।२५।।

नरसिंहाचे विधिवत् करावे पूजन । पवित्र स्थळी दर्भासनी बसून । दिशांचे रक्षण करावे जागृत मन । विष्णुभक्ते तदनंतर ।।२६।।

ज्या मंत्रांनी प्रतीकानुसार। प्रारंभापासून दिग्बंध थोर । ज्या मंत्रोच्चारांनी तत्पर करावा तो आता, कथितो ।।२७।।

रक्षो नारायण पूर्व दिशेला । कमलनयन राखो दक्षिणेला । प्रद्युम्न रक्षो पश्चिमेला । तैसाची वामदेव उत्तरेसी ।।२८।।

ईशान्येस रक्षो वामन । आग्नेय- दिशेसी जनार्दन । नैर्ऋत्येस पद्मनाभ पावन । वायव्येला माधव ।।२९।।

उर्ध्व दिशेला देव गोवर्धन । अधर दिशेला त्रिविक्रम । ह्या दश दिशांत सगळीकडून । रक्षो केशव मजला जगीं ।।३०।।

वराह रक्षो पाण्यात । जमनीवरी वामन तुष्ट । नरसिंह राखो

महा अरण्यात । सर्व बाजूंनी केशव ।।३१।।
ऐश्या रिती दिग्बंध करूनी, विष्णुसी स्मरावे सर्वत्र मनी । अव्यग्रचित होऊनी, न्यास कर्म करावे विधि अनुसार ।।३२।।
आंगठ्याच्या अग्री गोविन्द । तर्जनीवरी महीश्वर सुखद । मधल्या बोटावर हृषीकेश मोदप्रद । ऐसा न्यास करावा ।।३३।।
अनामिकेवर त्रिविक्रम । करंगळीवरी विष्णूचा न्यास उत्तम । तळव्यावरी माधव सर्वोत्तम । ऐसा न्यास करावा ।।३४।।
परमात्मा ईश्वर देव हृदयात । आणि नृसिंह मनगटात । हाताच्या पृष्ठभागी दृढ चित्तात । जनार्दनाचा न्यास करावा ।।३५।।
ऐसे वैष्णाव न्यास जो करित । तो सर्वव्यापांतुनी होय मुक्त । करन्यास ऐसे करोनी पुनित । अंगन्यास नंतर करावे ।।३६।।
शेंडीच्या जागी केशवाचा न्यास । डोक्यावरी नारायणाचा न्यास । कपाळावरी माधवास । स्मरून न्यास करावा ।।३७।।
गोविंदाचा न्यास भ्रूमध्यात । विष्णुन्यास डोळ्यांत । मधुसूदनाचा न्यास तत्पश्चात् । कानांस स्पर्शूनी करावा ।।३८।।
गालास स्पर्श करून । त्रिविक्रमाचा न्यास मनोमन । कानांच्या मुळांसी स्पर्शून । करावा न्यास वामनाचा ।।३९।।
दोन्ही नाकपुड्यांस स्पर्शून । प्राज्ञ मनुजाने कल्पावा

श्रीधर शोभन । वरच्या ओठास स्पर्शून । हृषीकेशाचा न्यास करावा ।।४०।।
खालच्या ओठास स्पर्शिता पद्मनाभ स्मरावा । दातांच्या पंक्तीस स्पर्शिता दामोदराचा न्यास करावा । हनुवटीस स्पर्श करून न्यासावा । वराह देव ।।४१।।
जिभेस स्पर्श करावा । तेथे वासुदेव न्यासावा ।
ताळूस स्पर्शून न्यास करावा । गरुड-ध्वजाचा ।।४२।।
कंठमध्यास स्पर्शून । चिंतावा वैकुंठ महान ।
नाकासी हात लावून । अनन्त स्मरावा तैसाची ।।४३।।
हे विप्रा उजव्या बाहूस । स्पर्शून पुरुषोत्तमाचा न्यास ।
स्पर्शून डाव्या भुजास । महाभागास स्मरावे ।।४४।।
राघवाचा न्यास हृदयात । हरीचा न्यास बेंबीत ।
दोन्ही स्तनास स्पर्शून मनात । आठवावा पीतवस्त्र ।।४५।।
पीताम्बराचा न्यास सर्व अंगावरी । हरीचा न्यास बेंबीवरी । हे विप्रा उजव्या हातावरी । संकर्षणाचा न्यास करावा ।।४६।।
डाव्या हातासी स्पर्श करावा । रिपुहर तेव्हा स्मरावा ।
कटिमध्यास स्पर्शून आठवावा । अपराजित विष्णू देव ।।४७।।
पायांशी दीर्घक्षितिधराचा न्यास । दोन्ही खांद्यावरी अच्युताचा न्यास । वक्षस्थळी माधवाचा न्यास । दोन्ही खाकांत योगशायी ।।४८।।

उजव्या बाजूस योगीश । डाव्या बाजूस श्रीपती विशेष । आतड्यात वासुदेवाचा न्यास । गुदमध्यात अव्ययाचा ।।४९।।

जननेंद्रियात स्वयंभुव न्यासावा । दोन्ही मांड्यांत गदाधर न्यासावा । गुडघ्यांवरी चक्रधर न्यासावा । दोन्ही जांघांत अच्युत ।।५०।।

पुष्कराक्ष (कमलनयन) दोन्ही पायात । न्यासावा भगवंत विश्वरूपी सतत । न्यासावा एकचित्त । दृढभक्तीने ।।५१।।

नरसिंह दोन्ही घोट्यांत । चरणपृष्ठी अमित ओजस ध्यानात । बोटांत श्रीधर न्यस्त । पद्माक्ष सर्व सांध्यांत ।।५२।।

नखांत माधवाचा न्यास । चरण-तळात अच्युताचा न्यास । शरीरावरील केसांच्या मुळात न्यास । गुडाकेशाचा करावा ।।५३।।

रक्त हाडे मज्जातंतूंत । कृष्ण न्यासावा एकचित्त । मनबुद्धि अहंकार चित्तात । जनार्दनाचा न्यास करावा ।।५४।।

आपादमस्तकी स्मरावा । ज्ञात्याने प्रद्युम्न न्यासावा । हा न्यास-विधी करावा । स्नानकाळी तैसाची देवपूजेत ।।५५।।

होमाच्या आरंभी करावा । सकाळ दुपार सायं आठवावा । नित्य न्यासविधी बरवा । श्रद्धा भावे ।।५६।।

ऐसा न्यासविधी जो करील । स्वतःच नारायण तो होईल । त्याचे शरीर विष्णुमय होईल । जोवरी अन्य काही न बोले ।।५७।।

ऐश्या परी न्यासविधी करून । जे करावे कार्य शोभन । करी

आता ते श्रवण । विप्रा, ध्यानपूर्वक ।।५८।।

देवाच्या पायाच्या मूलभागात । शुभ्र शंखाचा न्यास इष्ट । हृदयावरी वनमाळा न्यासाव्या । सर्व देवांनी पूजिल्या ज्या ।।५९।।

वक्षस्थळी गदा न्यासून । सुदर्शन चक्र पृष्ठभागी कल्पून । डोक्यावरी श्रीवत्सांक न्यासून । पंचांग कवच न्यासावे ।।६०।।

ॐ भगवान विष्णूला । केशवाला सर्व क्लेशहर्त्याला । नमन करून उजवा हात लावावा । हृदयासी हृदयाय नमः म्हणून ।।६१।।

ॐ भगवान विष्णूला । केशवाला सर्व क्लेशहर्त्याला । नमन करून उजवा हात लावावा । शिरसे स्वाहा उच्चारोनी डोक्यासी ।।६२।।

ॐ भगवान विष्णूला । केशवाला नमून सर्व क्लेश-हर्त्याला । शेंडीला - शेंडीच्या जागी वा हात लावावा । शिखायै वषट् ऐसे उच्चारुनी ।।६३।।

ॐ भगवान विष्णूला । केशवाला नमून सर्व क्लेश-हर्त्याला । दोन्ही हात आत वळवून कवचन्यास करावा । कवचाय हुम् मंत्र उच्चारुन ।।६४।।

ॐ भगवान विष्णूला । केशवास सर्व क्लेशहर्त्याला । दोन्ही डोळ्यांमध्ये स्पर्श करावा । नेत्रत्रयाय वौषट् मंत्र जपून ।।६५।।

ॐ भगवान विष्णूला । नमून केशवाला क्लेशहर्त्याला । उजवा कर मानेभोवती नेऊन करावा । तीन बोटांनी वामकरावर आवाज ।।६६।।

अस्त्राय फट् मंत्र म्हणून । ऐसे अंगन्यास करून । दिग्बंध करावा पावन । स्मरून विष्णूदेवाला ।।६७।।

विष्णू अर्ध्व आणि अधर । वैकुंठ रक्षो दशदिशा उदार । धनुर्धारी राम सर्वबाजूस वीर । रक्षो केशव चक्रधारी ।।६८।।

ऐसा अपामार्जनक न्यास पावक । सर्व आधिव्याधि विनाशक । स्वत:साठी अन्य रुग्णार्थ वा करावा नि:शंक । ऐसाची विधी ।।६९।।

विष्णुभक्ताने करावा । सर्वसिद्धिप्रद बरवा । जपाच्या प्रारंभकाळी तैसाचि करावा । श्रेष्ठ अपामार्जनविधी ।।७०।।

नंतर हे अपामार्जन स्तोत्र जपावे । हे दाल्भ्या रोगविनाशक घ्यावे । तेणे दीर्घ आयु ऐश्वर्य लाभावे । ज्ञात्यासी ऐसे फळ असे ।।७१।।

जे जे शुभकर जगात । ते ते मनुष्यास लाभत । सर्व भूतांपासून अभय होऊन प्राप्त । अन्ती गमन विष्णुलोकी ।।७२।।

ह्या श्री अपामार्जन स्तोत्र-मंत्राचा । भगवान पुलत्स्य ऋषी साचा । अनुष्टुप् त्रिष्टुप् बृहती छंदाचा । उपयोग येथे केला असे ।।७३।।

श्रीवराह नृसिंह वामन । ह्या स्तोत्रमंत्रांची देवता शोभन ।

अमुक रुग्णाचे वा माझे दुरित्त करी हरण । ऐसे बीज उच्चारावे ।।७३।।

अच्युत-अनंत गोविंद ऐसी । शक्ती ह्या स्तोत्रासी । तापलेल्या सोन्यासम केशांतासी । कीलक येथे समजावे ।।७३।।

देवा धगधगत्या अग्नीसम नयनयुत । ऐसे म्हणता होत कवच पुनित । हे वज्रायुध नख स्पर्श ऐसे उच्चारित । तेची व्यापक जाणावे ।।७३।।

हां हां हुं हुं फट् हे अस्त्र जाणावे । नंतर साधके ऐसे म्हणावे । अथवा अमक्याच्या विषयी व्हावे । ताप सन्निपातादी पीडेचे शमन ।।७३।।

ह्यास्तव अपामार्जन स्तोत्राचा । जप करावा विष्णु-देवाचा । ध्यान श्लोक तयाचा । तो ऐसा म्हणावा ।।७३।।

निळ्या कमलासम श्याम वर्ण । पीतांबरधारी हरी पावन । शंखचक्र गदाहस्त शोभन । ध्याऊन जपावे अपामार्जन स्तोत्र ।।७३।।

ज्याची तनू मोठी, गात्रे मोठी । दाढा मोठ्या शोभन असती । समस्त वेदवेदांग युक्तासी । अलंकृती भूषणांनी ।।७४।।

पाताळातील कल्पून । जमिनीवरील माती हाती घेऊन । भूमीस नतमस्तक नमून । डोक्यावरी ठेऊन वास घ्यावा ।।७५।।

स्मरावा देव अच्युत । जो रत्न वैडूर्य मोती आदी भूषणांनी

सुशोभित । पीताम्बरधारी देव पुनित । शुभ्रपुष्पमाला चंदन-लेपाने ।।७६।।

तेहतीसकोटी देवांकडून स्तुत । अहर्निश जो देव मुदान्वित । सनकादी ऋषींकडूनही स्तुत । ऐसा विष्णू स्मरावा ।।७७।।

नृत्यकर्त्या अप्सरा गाती । किन्नरही ज्याचे स्तोत्र चित्ती । ऐसे ध्यान करून अतंद्रित चित्ती । ध्यावे आपुल्या आत्म्यासीही ।।७८।।

सुर्वण मंडपात जे स्थित । जे असे केसरयुक्त । कर्णिका आठ दलांनी युक्त । ध्यान करावे ऐश्या कमळाचे ।।७९।।

देव जो कलंकरहित तो ध्यावा आपुल्या चित्तात ।
ज्याची प्रभा विलसत । दहाकोटी पूर्ण चन्द्रांसम ।।८०।।

विजेसमान तेज शोभायुक्त । ऐश्या कंठ देठाने शोभिवंत । ज्याचे वक्षस्थळ श्रीवत्सांकित । अति तीक्ष्ण दाढा ज्याच्या ।।८१।।

ज्याचे असती सुंदर नयन । जास्वंदीच्या फुलासमान । ज्याच्या हाताचे तळवे लाल शोभन । पद्मासनी जो बैसला ।।८२।।

जो असे योगपद्म समन्वित । पिवळे वस्त्र जेणे नेसले असत । शुभ्रवस्त्राचे उपरणे शोभिवंत । शरीरावरी जयाच्या ।।८३।।

सोन्याच्या करगोट्याने सुशोभित । नूपुरे पायांवरी विराजत । वनमाला आदींनी शोभायुक्त । मोतीहारांनी

अलंकृत जो ।।८४।।

कमलासहित चार करांनी युक्त । कमळाच्या पाकळीसम नयन शोभिवंत । प्रातः कालीन सूर्यासम प्रभावंत । विराजला ऐश्या कुंडल द्वयाने ।।८५।।

अनेक सूर्यासमान । मस्तक ज्याचे मुकुट किरीटाने शोभत । शंख चक्रधारी दोन भुज विराजत । वरती जे उचललेले ।।८६।।

केयूर मण्याशी करित । कांतीसी स्पर्धा ऐसे ते असत । मुद्रिका रत्न त्याने शोभिवंत । गुडघ्यावर ठेविले कर जेणे ।।८७।।

रत्नासम नखांनी युक्त । ऐसे ते दोन्ही कर शोभिवंत । चतुर्थीच्या चंद्रासम मुखकमळ झळकत । सुंदर दाढा युक्त जे ।।८८।।

मोत्यांच्या प्रभे समान । ज्याची दंतपंक्ती विराजे सुशोभन । चाफ्याच्या फुलासम आभा मनमोहन । जयाच्या मुखकमल-नासिकेची ।।८९।।

ज्याच्या मुखाचे ओठ अति रक्त । भयंकर जे उघडले असत । डाव्या मांडीवर बसल्या श्रीने युक्त । शांतिप्रद जी तुंग रोहिणी ।।९०।।

श्रेयस्कर चक्र चरण युक्त । सुंदर शुभलक्षण नाक शोभत । सुंदर भिवया सुकेसांनी मंडित । सुश्रोणी सुभुजा द्विभुजा असती ।।९१।।

सुप्रतिष्ठित जी शुभ्रदन्ती । चार भुजांनी युक्त स्मरावी ती । रेशमी वस्त्र-युक्त सुंदर अंगकान्ती । सर्वकामप्रदा हरिणी जी ।।१२।।

तापल्या सोन्यासमान लखलखीत । सर्व अलंकारांनी भूषित । सुवर्णकलशासम जिचे असत । उन्नत मांसल स्तनद्वय ।।१३।।

मावळुंग करी जिने धरिले । बाहूवरती उचललेले । दोन कमळे धरून शोभले । ऐश्या सुवर्णसम करान्वित ।।१४।।

ऐसी देवी स्मरावी । नरसिंहाच्या डाव्या मांडीवरी । कर्णिकित देवाचीही आठवण ठेवावी । काम्य अथवा नित्य कर्मात ।।१५।।

स्वतःस नृसिंहाचे शरीर मानावे । हेमाद्रीच्या शिखरासम आकारासी स्मरावे । शुद्ध स्फटिका समान देवास भजावे । पूर्ण चन्द्रासम सुंदर जो ।।१६।।

द्विभुज वामानाचे स्मरण । जो तेजस्वी कोटि सूर्यासमान । सुशीतल कोटि चन्द्रासम । स्मरावा ज्वलन्त कालानल नामक ।।१७।।

जो कोटि विजांसमान प्रभावान । ज्याचे सुंदर कमलासम नयन । किरीटाने बिराजमान । ऐसा नृसिंह स्मरावा ।।१८।।

सोळा हजार स्त्रियांनी । गंधर्व अप्सरांच्या गणांनी । चर्तुमुख

ब्रह्मदेवादि देवेशांनी । स्तोत्रे आराधने जो तोषविला ।।९९।।

त्र्यम्बक तीन नयनयुत । महादेव जो प्रख्यात । तो नाचे हरीच्या पुढ्यात । वंदन ऐश्या त्या वामनासी ।।१००।।

हरिणाचे कातडे धरी तैसाचि दंडधर । कमंडलु मेखलादींनी रुचिर । पावन मूर्ती वामन सुंदर । तयासी करुया नमस्कार ।।१०१।।

तीन पावलांनी त्रैलोक्य व्यापिले । जयाने सर्व शत्रू जिंकिले । वेदज्ञानपटू बटूस भावबळे । नमस्कार करूया ।।१०२।।

पद्मासनस्थ जो शांत । पूर्णचन्द्रासम कोमलांग असत । तो श्रीपती ज्याच्या हातात । अमृताचा घट असे ।।१०३।।

करकमळी दहीमिश्रित कवळ विराजित । पिवळे वस्त्र परिधान केले असत । दंडावरी मुकुटावरी झळकत । केयूर माळा जयाच्या ।।१०४।।

नाना अलंकारांनी युक्त । स्फटिक मण्यासम शोभिवन्त । ऐशा वामनदेवास स्तवित । नित्यनेमें सर्वदा ।।१०५।।

घनश्याम शुभ्र जानव्याने युक्त । उत्तम कौपीन वस्त्रधारी पुनित । पीतकृष्ण हरिणचर्माने शोभत । छत्रधारी, दंडधारी ।।१०६।।

दिनकमळा समान विशाल नयन । ब्रह्मचारी देव वामन । तो करो रक्षण । अति सुविमल गात्रें ज्याची ।।१०७।।

सोन्याच्या भांड्यात । सुललित दह्याचे खंड आत ।

ते उजव्या हाताने धरिले असत । अमृत पूर्ण कलश डाव्या करी ।।१०८।।

जो ऐश्या वामनासी ध्यात । तो सकल दुःखे तरून जात । क्षीरसागर लहरींनी विलसत । शुभ्र अरुण शरीर ज्याचे ।।१०९।।

मणि मुक्तामय रम्य आसनावर रूप श्रीयुक्त । बैसला जो शोभिवंत । शुभ्र मेघांनी अभिषिक्त । अमृताने जो अतिसुन्दर ।।११०।।

आपणासी वामन मानून । अपामार्जन जपावे पावन । ज्यायोगे जपकर्त्यास शोभन । वरदान मिळे जगी ।।१११।।

परमार्थरूप महात्म्यास । नमन असो उत्तम पुरूषास । पुनः पुन्हा वंदून तयास । प्रार्थना मी करीतसे ।।११२।।

मी जे जे बोलेन । ते ते सिद्ध होवो माझे वचन । अरूप बहुरूपी व्यापकासी नमन । परमात्म्यासी मी केले ।।११३।।

पाप रहिताला शुद्ध रूपाला । ध्यान करिता पाप हर्त्याला । नमन करून प्रार्थित तयाला । मी जे बोलेन ते सत्य होवो ।।११४।।

नारायणाला देवाला । विश्वेशाला ईश्वराला । वंदन करून प्रार्थी तयाला । जे बोलेन ते सिद्ध होवो ।।११५।।

सच्चिदानंद रूपाला । योग्याला परमात्म्याला । नमून प्रार्थी

तयाला । जे बोलेन ते ते सिद्ध होवो ।।११६।।
वराहरूप नृसिंहाला । महात्म्याला वामनाला ।
नमून प्रार्थी तयाला । जे बोलेन ते सिद्ध होवो ।।११७।।
गोविन्दाला पद्मानाभाला । वासुदेवाला विष्णूला ।
नमून प्रार्थी मी तयाला । बोलेन जे ते सिद्ध होवो ।।११८।।
दामोदराला देवाला । अनंताला महात्म्याला । नमून प्रार्थी मी तयाला । जे बोलेन ते ते सिद्ध होवो ।।११९।। जनार्दनाला कृष्णाला । उपेंद्राला श्रीधराला ।
नमून प्रार्थी तयाला । जे बोलेन ते सिद्ध होवो ।।१२०।।
त्रिविक्रमाला रामाला । वैकुंठाला नररूपाला । नमून करी प्रार्थनेला । जे जे बोलेन ते सिद्ध होवो ।।१२१।।
हिरण्यगर्भ- पतीला । हिरण्यकश्यपूचा वध कर्त्याला । नमून करी प्रार्थनेला । जे जे बोलेन ते ते सिद्ध होवो ।।१२२।।
भक्तप्रियास विभूला । शार्ङ्गधराला विष्वक्सेनाला । नमून करी प्रार्थनेला । जे जे बोलेन ते ते सिद्ध होवो ।।१२३।।
करात चक्रधर्त्या शूराला । गरुडवाहनाला बुद्धिमंताला । नमून करीन प्रार्थनेला । जे जे बोलेन ते ते सिद्ध होवो ।।१२४।।
अधोक्षजाला दक्षाला । मत्स्यरूपाला मधुसूदनाला । वंदून करीन प्रार्थनेला । जे जे बोलेन ते ते सिद्ध होवो ।।१२५।।
दैत्य शत्रूला उपेंद्राला । प्राणिमात्रांच्या जीवनाला । नमून करी प्रार्थनेला । जे जे बोलेन ते ते सिद्ध होवो ।।१२६।।

विष्टरश्रव्याला त्या देवाला । दुग्धसमुद्री जो पहुडला ।
नमून करी प्रार्थनेला । जे जे बोलेन ते ते सिद्ध होवो ।।१२७।।
नरसिंहासी महाउग्र तेजाला । तैशा तुज वराहेशाला ।
नृसिंहेशास वामनेशाला । त्रिविक्रमा तुज ही प्रार्थना ।।१२८।।
त्रिविक्रमा हयग्रीवेशाला । सर्वेशाला हृषीकेशाला ।
प्रार्थना करितो तुजला । हरण करी अशुभाचे ।।१२९।।
अपराजित सुदर्शन । चक्रादी चार परम आयुधांनी पावन । अखंडित अनुभावे करून । सर्व दुःखहारी होई तू ।।१३०।।
माझे वा अमक्याचे करी दूर । दुष्कृत अथवा दुष्टविचार दूर । मृत्युबाधा-दुःख-भयहर । दुरिष्टाचे जे फळ ।।१३१।।
जे जे दुजाने अमंगल ध्यानसंस्थ केले । जादुटोणादी कर्म सगळे । विषस्पर्श महारोग प्रयुक्त झाले । ते सत्वर क्षीण करी ।।१३२।।
कृष्णाला वासुदेवाला नमन । हरीला परमात्म्याला वंदन । प्रणतांच्या क्लेशहर्त्याला अभिवादन । गोविंदाला नमो नमः ।।१३३।।
हरीला वासुदेवाला । अभिवादन शार्ङ्गधनुर्धराला ।
तैसेची श्रीकृष्णाला । कमलनेत्रासी वंदन ।।१३४।।
केशवाला कृष्णाला । नमन असो निर्मळ-वेषाला ।
कमळाच्या पिवळ्या परागांचा जो वेष बनला । अत्यंत

निर्मळ विशुद्ध ।।१३५।।

मोठ्या युद्धी शत्रुस्कंध । उखडिले धृष्टरुपे विविध । दाढेने उकरिली पृथ्वी सबांध । उचलून धरली ज्या चक्रधराने ।।१३६।।

त्रिमूर्तीपतीस नमन । महायज्ञ वराहाला वंदन । शेषाच्या रुंद फणांवर शयन । करितो जो महाविष्णू ।।१३७।।

ज्याचे केस तप्त सुवर्णवर्ण । जळत्या अग्नीसम लोचन । वज्रायुधासम नखस्पर्श भयद जाण । दिव्य सिंहा नमन तुला ।।१३८।।

अपार नरसिंहाला । दिव्य सिंहा वारंवार नमन तुला । श्रीनृसिंहा दिव्य सिंहभक्ताला । सर्व अरिष्ट हारक दु:ख-संकटहर्ता तू ।।१३९।।

एकमेव वीर अद्भुत बलयुक्त । मंत्र यंत्राचा एक भंजक ख्यात । सर्वत्र राख माखला तू अग्निलोचन युक्त । भयंकर सर्वकाम ।।१४०।।

हिंसका मजल न मारोत । देवेशा तुझ्या प्रसादाने मी युक्त । तीक्ष्ण नखाग्रांनी फाडित । छाती जो तू दैत्यपतीची ।।१४१।।

सुरेन्द्रांनी केले रक्षण । दैत्य राजास मारून । सुदर्शपद्म गदाशंखधारी महान । नृसिंह देवो मला अभय ।।१४२।।

कश्यपाला अतिःस्वाला । ऋग्वेद यजुह साम रूपाला ।

पृथ्वीचे उल्लंघन करणाराला । वामन रूपा तुला नमो नमः ।।१४३।।

हे वराहा जी महादुष्ट । सर्व पापफळे अनिष्ट ।
मर्दन करी त्यांचे तू महादंष्ट्र । कृपा करी महीधरा ।।१४४।।

नरसिंहा करालवदना । दंत भागी नखात ज्ज्वलना । ह्या रुग्णाच्या रोग दुःखाच्या करी विनाशना । जे दुष्ट भयंकर ते आपुल्या निनादाने ।।१४५।।

ऋग्यजुः सामगर्भ असत । ऐश्या वचनांनी जो वामन-रूपधर वर्तत । सर्व दुःखे शमवी क्षणात । ती दूर करी क्षणी जनार्दना ।।१४६।।

ह्या श्रीज्वर-मंत्राचा । कालाग्नि ऋषी साचा ।
अनुष्टुप् छंद तयाचा । महादेव ही देवता ।।१४७।।

सर्व तापांच्या शमनार्थ । ह्या स्तोत्राचा विनियोग ज्ञात । त्याचा गायत्रीमंत्र बलयुक्त । ऐसा असे ।।१४८।।

भस्म आयुधाला आम्ही जाणतो । एवदंष्ट्राला मनी साठवितो । तो ज्वर आम्हां रक्षो जगात । उत्साहवर्धक होवो तो ।।१४९।।

त्रिपाद भस्म प्रहरण । त्रिशिर आरक्त लोचन । तो रोगपती ज्वर होऊन प्रसन्न । सुख देवो मला सदा ।।१५०।। ज्या चार मंत्रांचा दहा हजार । जप प्रशंसिला असे थोर । त्यांचे वर्णन करितो समग्र । एकचित्ते श्रवण करा ।।१५१।।

जे आदि अंत युक्त । कवी सनातन अनुशासनरत । सूक्ष्म तैसे महदाकार वर्तत । अनिरुद्ध प्रद्युम्न संकर्षण वासुदेव ।।१५२।।
माझे सर्व ज्वार नष्ट करोत । कुबेरा तुझे मुख रौद्र असत । हे नंदी तू आनंद आण मजप्रत । घोर पापमृत्युभय नष्ट करी ।।१५३।।
अंग वंग कलिंगात । सौराष्ट्रात तैसे मगधात । जे दिले वाराणसीत । हे ज्वरा ते वचन न स्मरसी का ? ।।१५४।।
श्रीकंठाच्या क्रोधातून । ज्याचा झाला जन्म । सुर असुर करिती जया नमन । ऐश्या ज्वरा सुख दे मला ।।१५५।।
नित्य यज्ञशत्रू तू ज्ञात । शीघ्र सौख्य दे ज्वरा मजप्रत । तुझा प्रताप अद्‌भुत । ऐसा जगी ख्यात असे ।।१५६।।
जो सरस्वती-नदीच्या काठावर । निपुत्रिक ब्राह्मण मरणपर । जवादि कृत पद्‌मात आमंत्रून थोर । करून पूजा तयाची ।।१५७।।
तीन रात्री मुदतीचा ताप नष्ट । म्हणून तिलोदक देतो इष्ट । ज्या मंत्रांत ज्या वर्णिल्या असत । त्या त्या देवतांसी अर्पण करावे ।।१५८।।
तांब्याच्या भांड्यात । तीळ घेऊन पुनित । गंध पुष्प अक्षतांनी पूजित । शुद्ध जले पवित्र करावे ।।१५९।।
सहस्र संख्येने आवाहन करून । शुद्ध चित्ते पूजन । स्थंडिलावरी

ते ठेवून । नंतर होम करावा ।।१६०।।

दूध तूप आंब्याची पाने अर्पण । होमात करावी आदिअन्त मंत्र उच्चारून शेवटी स्वाहा म्हणून । दहा मंत्रांनी मंत्रज्ञाने ।।१६१।।

ऐसे करिता सर्व ज्वर विशेष शमन पावती निःशेष । पुनः त्यांची बाधा विष । न बाधे दुष्टादींच्या परिग्रहे ।।१६२।।

ऐसा विधी करिता नर । लाभेल दीर्घायुष्य ज्ञान धन अपार । आरोग्य ऐश्वर्य ज्ञान वृद्धिकर । फळ ऐसे तयाचे ।।१६३।।

जे जे शुभतर जगात । ते ते सारे लाभेल निश्चित । या अपामार्जन स्तोत्राने त्वरित । संशय येथ मुळी नसे ।।१६४।।

एक दिवसाचा, दोन दिवसांचा । तैसा ज्वर जो तीन दिवसांचा । उग्र ज्वर तैसा चार दिवसांचा । दोष सान्निपातादी ज्वर तैसे ।।१६५।।

तैसेची आंगतुक जे ज्वर । शमन करी त्यांचे शीघ्र । गोविंदा वेदनांचे छेदन कर । समूळ नष्ट करी त्यांना ।।१६६।।

डोळ्यांचे दुःख शिरोवेदनेचे दुःख । पोटदुखीतून दुःख उद्‌भवत । अति कफ खोकला जो करी त्रस्त । दीर्घ श्वास कम्पयुक्त ताप तैसा ।।१६७।।

गुदेंद्रियाचे पायाचे रोग । कुष्ठरोग तैसे क्षयरोग । कावीळ मधुमेहादि रोग । अत्यंत दारुण जे असती ।।१६८।। भगंदर अतिसार । मुख रोग वल्गुली नाम भयंकर ।

चित्र आदी नखरोग असह्य फार । अन्तर्बाह्य स्थित अस्थि त्वचा रोग ।।१६९।।

मूतखडादी मूत्र रोग घोर । दारुण रोग अन्य जे अपार । वातजनित जे रोग भयंकर । पित्त संभूत जे असती ।।१७०।।

कफापासून जे उद्भूत । दुसरे रोग सान्निपातिक ज्ञात । आगंतुक रोग जे होत । लूत गळवे आदिक ।।१७१।।

ते सगळे होवोत प्रशमित । वासुदेवाने अपामार्जित । ते सर्व विलय पावोत । विष्णु नावाच्या उच्चाराने ।।१७२।।

निःशेष ते क्षय पावोत । हरीच्या चक्राने अभिहत । अच्युत अनंत गोविंद नामे त्वरित । नामोच्चार औषधाने ।।१७३।।

सगळे रोग नष्ट होतात । सत्य सत्यच सांगत । अच्युत नामे मन पवित्र होत । अनंत नामे भाषण ।।१७४।।

गोविंद नामाने शरीर पवित्र । ज्ञात अज्ञात पातकांतून पवित्र । अधोक्षजासी स्मरून जप सर्वत्र । कैसा करावा ते सांगतो ।।१७५।।

ॐ नमः आदि अन्ती । म्हणावे जप करताना दृढभक्ती । अच्युत अनंत गोविंद जगती । परम आनंद माधव हा मंत्र ।।१७६।।

हे सत्य हे सत्य आहे । बाहू उंचावून पुनः पुनः सांगताहे । वेदशास्त्राहून थोर काय आहे । केशवाहून श्रेष्ठ देव कोण ? ।।१७७।।

स्थावर जंगम कृत्रिम । जे जे विष सुदारुण ।
उत्पन्न दंतपीडेतून । नखपीडेतून उद्‌भूत जे ।।१७८।।
जे आकाशप्रभव विष । कोळी मुंग्यादि पासून विशेष । दुःख देते अत्यंत । ते सर्व त्वरित शमन होवो ।।१७९।। हे जनार्दना गायिली तुझी स्तुती । ग्रह प्रेत ग्रहादींची भीती । डाकिनी दुष्ट ग्रहांची भयभीती । दूर करी सत्वर ।।१८०।।
मुख मंडलिका घोर । रेवती वृद्धरेवती रोग भयंकर । वृद्ध नामक ग्रह उग्र । मातृग्रहही तैसेची ।।१८१।।
बाळ विष्णूचे चरित । बाळग्रहां ह्या मारण्या समर्थ । नरसिंहा तुझ्या दृष्टीने यौवनात । जळून जे गेले असती ।।१८२।।
आयाळीने युक्त कराल वदन । नारसिंह महा बलवान । सर्व दुष्ट ग्रह हे अग्निलोचन । खाऊन टाक संपूर्ण तू ।।१८३।।
जे वृद्धांचे ग्रहरोग ज्ञात । तैसेची बाळ रोग क्वचित ।
ते सर्व नष्ट होवोत । नरसिंहाच्या कृपेने ।।१८४।।
नरसिंहा महासिंहा हो प्रसन्न । तू ज्वाला माला ज्वालानन । ह्या रुग्णाचे रोग देवदेवेशा छिन्न । करी धनुष्य घेऊन हाती ।।१८५।।
जे रोग जे महा उत्पात । जे विष जे महाग्रह दुरापास्त । अत्यंत पातक संभूत । जे कुटिल बुद्धिजन्य असती ।।१८६।।
जी क्रुर भूते असती । ग्रहपीडा ज्या दारुण पीडिती । शस्त्राघाते

व्रण जे पडती । दोष ज्वाला-गर्दभाकादी ।।१८७।।
जी अन्य भूते वर्तती । प्राण्यांसी पीडा जी देती । त्या सर्वांचा नाश करी जगती । सर्वात्म्या परमात्म्या जनार्दना ।।१८८।।
छोटे रूप घेऊन । वासुदेवा करी त्यांचा नाश त्वरित येऊन । सुदर्शन चक्र सोडून । ज्वाला माला भीषण जे ।।१८९।।
हे श्रेष्ठ अच्युत देवा । तुझा मी करीतसे धावा । सर्व दुःखांच्या उपशमे करावा । कृपाप्रसाद आमुचे वरी ।।१९०।।
महाचक्र सुदर्शन ख्यात । गोविंदाचे श्रेष्ठ आयुध तू जगात । महावेग तुझा असत । कोटि सूर्यासम प्रभा ।।१९१।।
त्रैलोक्य रक्षणकर्ता । तू दुष्टदानव मर्दनकर्ता । तीक्ष्ण धारा महावेगा आता । छिन्न करी समूळ महाज्वर ।।१९२।।
महाव्याधींचे छेदन । करी समूळ उच्चाटन ।
महाज्वराचेही संपूर्ण । उच्चाटन करी तू ।।१९३।।
वातरोग लूता रोग । घोर महाविष सवेग । वेदना दाह शूळ सवेग । निमिष ज्वालगर्दभास शमवी ।।१९४।।
सुदर्शनाच्या मंत्राने जावोत । दुष्ट ग्रह दशदिशात । म्हणोनी सुदर्शन मालामंत्र बलयुक्त । साधकाने जपावा ।।१९५।।
ॐ सुदर्शना तुला नमन । दुष्टांचे करी विदारण ।
दुरितांचे करी हनन । पाप सर्वही नष्ट करी ।।१९६।।
आरोग्य मज उत्तम । द्यावे तू कृपा करून । हां हां हुं हूं फट् ठः ठः मंत्र महान । ठार मार आमुच्या शत्रूंना ।।१९७।।

तू त्रैलोक्याचा रक्षणकर्ता । आज्ञा दे जनार्दना आता । सुदर्शनासी जेणे आर्ता । दुःख रोगातून मुक्ती ।।१९८।।

ॐ नमन श्रीभगवंता । सुदर्शन चक्रायुधासी आता । महाशस्त्र-राजासी नमन सर्वथा । भूतांपासून भय अवश्य नष्ट करी ।।१९९।।

छेदनकरी उच्छेदन । शत्रु-प्रयुक्त मंत्र यंत्रांचे येऊन । परतंत्र जारणमारणादीचे उच्चाटन । करी सुदर्शनचक्र राजा ।।२००।।

हुं फट् स्वाहा मंत्र जपून । करावे गरुड-ध्वजास नमन । भगवंतासी भक्ति भावपूर्ण । ऐसी प्रार्थना करावी ।।२०१।।

ये ये देवा नारायणा । सर्व ज्वरांच्या भयासी करी छेदना । सुदर्शन चक्राते कमलानना । रक्षी मजला आमरण ।।२०२।।

मुद्गर शंखचक्र गदा पद्म खड्ग । आयुधे तुझी सवेग । त्यांनी सर्व ज्वरांचे भय छेदून सर्वांग । त्वरित रक्षण तू करी माझे ।।२०३।।

रक्षणकर्ता तू जनार्दन । हुं फट् स्वाहा मंत्र उच्चारून । सुदर्शन चक्राचे करावे स्मरण । प्रार्थना त्यासी करावी ।।२०४।।

ॐ त्रौ ह्रीं महायंत्रा सुदर्शना । राजधगधग नितांत भयछेदना । करिती भयंकर, त्यांच्या करी छेदना । विदारण करी परमंत्रांचे ।।२०५।।

परमंत्राचे विदारण । अभिचार जादूटोणादी ग्रासून ।
परमंत्रांचे उच्चाटन । करी सुदर्शन-चक्रा तू ।।२०६।।
दुष्ट चेटुक कृती मारी । ग्रह वेताळ पिशाच महामारी । भूत प्रेतादींना भक्षण करी । भक्षून नष्ट करी त्यांना ।।२०७।।
सर्व भूतांसी भिववी । स्वाहा म्हणून गातो थोरवी । आचकाला विचकाला बरवी । करीतसे मी वंदना ।। २०८।।
सुचक्राला । असुरांतकचक्राला । सर्व लोक-रक्षकाला । अस्त्रराज सुदर्शन मंत्राला हुं फट् स्वाहा ।।२०९।।
ऐसी ही सुदर्शन विद्या ज्ञात । होते तैं रोगपीडादी समस्त । घाबरून पळती दुष्ट राक्षस जगात । विनाशही ते पावती ।।२१०।।
पूर्वेला तैसे पश्चिमेला । दक्षिणेला उत्तरेला । ईशान्येला आग्नेयी । नैर्ऋत्य दिशेला । तैसेचि महादिशेसी ।।२११।।
वायव्येला सर्व भूतांपासून । सदैव रक्षण करो तो महान । पृथ्वीवरी स्वर्गी अंतरिक्षात रक्षण । करो वरती खालती, पाठी पुढे ।।२१२।।
वाघ-सिंह-वराहांपासून । आग, चोरांच्या भयातून ।
करो माझे संरक्षण । बहुरूपी जनार्दन ।।२१३।।
विष्णु सत्यार्थे सर्व जग असत । देव असुर मानवासहित । त्या सत्यबळे ह्या रोग्याचे दुरित । शमन होवो सर्वही ।।२१४।।
जर विष्णूस स्मरता क्षणात । पातकांचा क्षय होत ।

तरी त्याचे सत्याने दुष्ट समस्त । ह्या रुग्णाचे शमन होवोत रोगादी ।।२१५।।
जरी यज्ञेश्वर ऐसी स्तुती । वेदांतही करिती । तर ह्या सर्व दुष्ट रोगादींची शांति । ह्या रोग्याची त्वरित होवो ।।२१६।।
जर परमात्मा विष्णू वेदांतात । स्तुतिपात्र झाला गीतात । तर त्या सत्यबळे शमन होवोत । ह्या रुग्णाचे सर्व रोगादी ।।२१७।।
जर विष्णूची स्तुती । योगेश्वर ऐसी वेदांतही गाती । तर त्या सत्याधारे शांती । होवो ह्या रोग्याच्या सर्व रोगांची ।।२१८।।
शांति होवो शुभ होवो समस्त । दुःख भय सारे होऊन नष्ट । दर्भांनी मी केले अभिषिक्त । विष्णु-शरीरापासून उत्पन्न जे ।।२१९।।
अपामार्जन गोविंद । नरनारायण सदा सुखद । हरीच्या वचने आरोग्य प्रशम सुखद । होवो सर्व दुःखांचा माझ्या ।।२२०।।
जो हे अपामार्जनस्तोत्रयंत्र अद्भुत । विद्वान श्रद्धा-समन्वित । धारण करी त्या जनळी न जात । दुष्ट ग्रह रोग राक्षसादी ।।२२१।।
हे स्तोत्र धन्य शत्रू संहारक । मुनि श्रेष्ठा यश-सुखकारक ।

वाचकास जपकर्त्यास श्रोत्यास निःशंक । परम गतिप्रद आहे ।।२३२।।

हरीचे हे स्तोत्र-राज प्रख्यात । अपामार्जनक नाम जगात । विष्णुभक्ताने जपावे प्रीतिप्रद उदात्त । नित्यनेमे वाचावे ।।२३३।।

ब्रह्महत्येचा विनाश करित । श्रीविष्णूस प्रसन्न करित । जो नितनेमे हे म्हणत । त्यावरी गोविंद संतुष्ट ।।२३४।।

मनाने जे जे चिंतित । ते ते तयासी लाभत । कोटि पूर्वजन्मकृत पाप नष्ट । पठनमात्रे ह्या स्तोत्राच्या ।।२३५।।

सहस्त्र गाईंचे दान । देता जे मिळते पुण्य शोभन । परम पद अन्ती पावून । मुक्त होतो विष्णु भक्त ।।२३६।।

दाल्भ्य नाम महाभाग वर्तत । पुलस्त्य ब्रह्याचा पुत्र ख्यात । त्यांच्या संवादरूपी प्रख्यात । श्रेष्ठ अपामार्जनक स्तोत्र हे ।।२३७।।

इति श्रीविष्णुधर्म-पुराणात । दाल्भ्य- पुलस्त्य संवादात । जाहले जे ग्रथित । ते अपामार्जन स्तोत्र ते संपूर्ण झाले ।।२३८।।

संस्कृत-स्तोत्राचे रूपांतर । सीतारामे गणेशसुताने केले समग्र । अर्पिले श्रीकृष्णाचरणी सुखाकर । आरोग्यप्रद रोगविनाशक ।।२३९।।

न्यून जे ह्या अनुवादात । ते अनुवाद-कर्त्याचे असत ।
ते क्षम्य करून संत । पठन करोत सुधारून ।।२४०।।

वैदिक करिती उदकशांती । अपामार्जनक स्तोत्राची
तीच महती । प्राकृत उदकशांती । ऐसे म्हणती
स्तोत्रास ह्या ।।२४१।।

संस्कृत भाषेचे ज्ञान । नसे सर्वांसी म्हणून ।
अनुवादिले मराठी ओवीत पावन । देसाईकुलोत्पन्न
सीतारामे ।।२४२।।

ह्या अनुवादाने संतुष्ट । होवो श्रीमहानारायण सतत ।
ज्याच्या नामाचा जप केला अविरत । जनकाने
सीतारामाच्या ।।२४३।।

सारे होवोत सुखी निरोगी । सर्वांसी कल्याण
लाभो जगी । न कोणासही दुःख प्राप्त होवो जगी ।
ऐसी प्रार्थना श्रीविष्णूसी ।।२४४।।

।। ॐ तत् सत् ।।

